**A.A. to Special Repairs of Punatgaon**
**K.T.Weir (Tal. Nevasa Dist. Ahmednagar)**

**नेवासा तालुक्यातील को.प.बंधारा पुनतगाव या बंधाऱ्यास नवीन लोखंडी निडल्स बसविणेच्या विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र.प्रमा २०११/(२५३/२०११)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ०८/०७/२०११**

**पहावे :** कार्यकारी संचालक, गोमपाविम, औरंगाबाद यांचे पत्र क्र गोमपाविमतां-५/पुनतगाव विशेष दुरुस्ती/प्रमा/२२९५, दि.९.३.२०११

**प्रस्तावना :**

को.प.बंधारा पुनतगांव ता.नेवासा, जि.अहमदनगर हा प्रवरा नदीवर सन १९९२ साली बांधण्यात आलेला आहे. या बंधाऱ्याची साठवण क्षमता ९१ दलघफू इतकी असून प्रकल्पीय सिंचन क्षेत्र ८४५ हे. इतके आहे.

सप्टेंबर, २००८ मध्ये भंडारदरा व मुळा पाणलोट क्षेत्रात भरपूर प्रमाणात पाऊस झाल्याने भंडारदरा व मुळा धरणातून अतिरिक्त विसर्ग नदीपात्रात सोडण्यात आला होता. सदरच्या अतिरिक्त पुराच्या पाण्यामुळे पुनतगाव बंधाऱ्याच्या तीरांचा भराव वाहून गेला. बंधाऱ्याच्या स्लॅब पातळीवर २ मी. उंचीने पाणी वाहिल्याने भरावाचे उजव्या व डाव्या बाजून अश्मपटल वाहून गेले. नदीच्या पुरानंतर तातडीने यांत्रिकी विभागाकडून बंधाऱ्याच्या तीरावरील भरावाचे काम करुन बंधाऱ्यात पाणी साठा करण्यात आला.

या बंधाऱ्याच्या एकूण ४३४ फळया गंजल्या व नादुरुस्त झाले असल्याने पाण्याची मोठ्या प्रमाणात गळती होत होती व त्यामुळे बंधाऱ्यात पाणीसाठा होत नसल्याने मागील ५ वर्षात सरासरी ४६ हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली आलेले आहे. ४३४ नवीन लोखंडी निडल्स टाकल्याने फक्त ७९९ हेक्टर क्षेत्र पुनर्स्थापित होणार असून अश्मपटलामुळे भरावाच्या कामास संरक्षण होणार आहे. त्यानुसार विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

या शासन निर्णयाद्वारे अहमनदगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील को.प.बंधारा पुनतगाव या बंधाऱ्यास नवीन लोखंडी निडल्स बसविणेच्या विशेष दुरुस्ती कामाच्या रु. ४३.५६ लक्ष (रु.त्रेचाळीस लक्ष छप्पन्न हजार मात्र) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१) सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसूचीत करण्यात यावा. अशी अधिसूचना काढल्यानंतरच प्रस्तावित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.

या कामावर होणारा खर्च ४७०२-लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (विस्तार व सुधारणा/विशेष दुरुस्ती) १० विस्तार व सुधारणा कार्यक्रमांतर्गत उर्वरित महाराष्ट्र प्रदेशास भागभांडवली

अंशदान (योजनांतर्गत) (१०)(०४)गो.म.पा.वि.महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ७४८१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली मूळ प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.......... सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १००६/प्रक्र ८२/०६/विनिमय, दिनांक १३/३/२००७ नुसार विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर(www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०७०८१८२५४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत : परिशिष्ट

**( पां. तु. .केदारे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी-मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक,
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेविप्रा, नाशिक,
अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र.प्रमा २०११/(२५३/२०११)/सिंव्य(कामे), दिनांक ०८/०७/२०११ चे प्रपत्र**

## परिशीष्ट

| अ.क्र. | शीर्ष/उपशीर्ष | अंदाजित किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | २.१० X ०.५० मी.आकाराचे ४३४ लोखंडी निडल्स बसविणे | ४२.०२ |
| २ | बंधाऱ्याच्या तीरावर अश्मपटलाचे काम करणे | १.५४ |
| ३ | कामाप्रित्यर्थ एकूण खर्च | ४३.५६ |